**आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात केंद्र पुरस्कृत पशुवैद्यकीय रुग्णालये व दवाखाने यांची स्थापना बळकटीकरण-फिरते पशुवैद्यकीय पथक या योजनेकरीता निधी वितरीत करणेबाबत.**
**केंद्र हिस्सा (लेखाशिर्ष २४०३ई६११)**
**राज्य हिस्सा (लेखाशिर्ष २४०३ई६२९)**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२५ / प्र.क्र.०५ / कार्यासन ६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २० फेब्रुवारी, २०२५.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४.
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४ व दि.१२.०२.२०२५.
३) आदिवासी विकास विभाग पुनर्विनियोजन ज्ञापन क्र.बीयुडी-२०२५/प्र.क्र.५४/कार्या-६, दि. फेब्रुवारी, २०२५.
४) कृषी व पदुम विभाग,नस्ती क्र.बीयुडी-११२४/प्र.क्र.२४६/पदुम-३.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत कृषी विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या केंद्र पुरस्कृत केंद्र पुरस्कृत ॲस्कॅड योजनेंतर्गत आर्थिकदृष्टया महत्वाच्या पशुरोगांवर नियंत्रण या योजनेतून केंद्र पुरस्कृत पशुवैद्यकीय रुग्णालये व दवाखाने यांची स्थापना बळकटीकरण-फिरते पशुवैद्यकीय पथक या योजनेसाठी पुनर्विनियोजनाद्वारे वितरीत करण्याचा प्रस्ताव संदर्भाधीन क्र. ४ अन्वये प्राप्त झाला आहे. सदर प्रस्तावास वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पित तरतुदींतून निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र.टी-५ मधील २४०३-पशुसंवर्धन या मुख्य लेखाशीर्षाखाली केंद्र पुरस्कृत पशुवैद्यकीय रुग्णालये व दवाखाने यांची स्थापना बळकटीकरण-फिरते पशुवैद्यकीय पथक या योजनेसाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पित तरतुदींतून खालीलप्रमाणे निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**(रु. लाखात)**

| **योजनेचे नाव** | **लेखाशीर्ष व केंद्र/राज्य हिस्सा** | **बाब** | **सन २०२४-२५ मधील अर्थसंकल्पित तरतूद** | **सदर शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यात येत असलेली तरतूद** |
|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** |
| केंद्र पुरस्कृत पशुवैद्यकीय रुग्णालये व दवाखाने यांची स्थापना बळकटीकरण-फिरते पशुवैद्यकीय पथक | (लेखाशीर्ष २४०३ई६११) (केंद्र हिस्सा ६० टक्के) | ३१ - सहायक अनुदाने (वेतनेतर) | ३६.१९ | ३६.१८ |
| | (लेखाशीर्ष २४०३ई६२९) (राज्य हिस्सा ४० टक्के) | | २४.१३ | २४.१२ |
| **एकूण** | | | **६०.३२** | **६०.३०** |

२. उपरोक्त प्रमाणे **एकूण रु. ६०.३० लाख (अक्षरी रुपये साठ लाख तीस हजार फक्त)** इतका निधी प्रशासकिय विभाग प्रमुख म्हणून सचिव, कृषी विभाग यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ च्या शासन आदेशातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची राहील.

४. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

६. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतुन आदिवासी उपयोजना क्षेत्रात पायाभूत सुविधा निर्माण करण्याबाबतच्या तसेच वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात आणि आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात फक्त वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या वाचा क्र.१ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये तसेच अनौपचारिक संदर्भ क्र.१२१/२०२५, दि.०५.०२.२०२५ अन्वये दिलेल्या मंजुरीस अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०२२०१२०३५७२९२४ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA DEVARAM BHAWARI

Digitally signed by RAJENDRA DEVARAM BHAWARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e2f5429d49742f96b79e4293421ba2dfa8a71cad3864b9b289879d173b67fcdc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F617DED8E7182679ED107E63511160B2054D23D8173AD985E5B569A5802CEA5A, cn=RAJENDRA DEVARAM BHAWARI
Date: 2025.02.20 12:05:12 +05'30'

**( राजेंद्र दे. भवारी )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) सचिव, कृषी विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
६) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
७) संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
८) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
९) महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
१०) विभागीय आयुक्त, मुंबई / नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक/ अमरावती/ पुणे.
११) अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
१२) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१३) वित्त विभाग / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४) सार्वजनिक आरोग्य विभाग (आरोग्य-७), मंत्रालय, मुंबई
१५) कार्यासन अधिकारी (का-८ ), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१६) निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग.